महात्मा फुले मागासवर्ग विकासमहामंडळ मार्फत राबविण्यात येणा-या थेट कर्ज योजनेच्या कर्जाची मर्यादा रु.२५,०००/- वरुन रु.१,००,०००/- पर्यंत वाढविणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक : एमपीसी-२०१७/प्र.क्र.२७४/महामंडळे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०५ ऑक्टोंबर,२०१८

**वाचा :-** सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र :- महामं २००४/प्र.क्र.३८/विघयो-२ दि.३०/११/२००४

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये राज्यातील अनुसूचित जाती प्रवर्गातील दारिद्र्यरेषेखालील घटकांच्या आर्थिक उन्नतीसाठी तसेच त्यांना स्वयंरोजगाराच्या अधिकाधिक संधी उपलब्ध करून देण्याच्या उद्देशाने रु. २५,००० /- चे कर्ज महामंडळाकडून देण्याची योजना राबविण्यात येत आहे. अनुसूचित जातीच्या जास्तीत जास्त लोकांना कर्ज योजनांचा लाभ घेता येईल आणि महामंडळाच्या योजना प्रभाविपणे राबविणे शक्य होईल या उद्देशाने महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ मार्फत राबविण्यात येणा-या थेट कर्ज योजनेअंतर्गत कर्जाची मर्यादा रु.२५,०००/- वरुन रु.१,००,०००/- पर्यंत वाढविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:-

महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ मार्फत राबविण्यात येणा-या थेट कर्ज योजनेअंतर्गत कर्जाची मर्यादा रु.२५,०००/- वरुन रु.१,००,०००/- पर्यंत वाढविल्यास अनुसूचित जातीच्या जास्तीत जास्त लोकांना कर्ज योजनांचा लाभ घेता येईल आणि महामंडळाच्या योजना प्रभाविपणे राबविणे शक्य होईल या उद्देशाने महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ मार्फत राबविण्यात येणा-या थेट कर्ज योजनेअंतर्गत कर्जाची मर्यादा रु.२५,०००/- वरुन रु.१,००,०००/- पर्यंत या शासन निर्णयाद्वारे वाढविण्यात येत आहे.

२. महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ मार्फत राबविण्यात येणा-या थेट कर्ज योजनेचे स्वरूप पुढीलप्रमाणे असेल:-

| **प्रकल्प मुल्य** | **रु. १,००,०००/- पर्यंत** |
|---|---|
| **महामंडळाचा सहभाग** | रु. ८५,०००/- (८५% पर्यंत) |
| **अनुदान** | रु. १०,०००/- (१०% पर्यंत) |
| **अर्जदाराचा सहभाग** | रु.५,०००/- (५% पर्यंत) |
| **व्याजदर** | ४% |
| **परतफेड कालावधी** | ५ वर्षे (६० हप्ते) |

३. सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र :- महामं २००४/प्र.क्र.३८/विघयो-२ दि.३०/११/२००४ मधील अटी व शर्ती सदर योजनेस लागू राहतील. तसेच, प्रस्तुत योजनेवरील खर्च महामंडळाकडे उपलब्ध असलेल्या भागभांडवलातून करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्र. २०१८१००६११४३२१०८२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2018.10.06 11:45:32 +05'30'

**(अ.को.अहिरे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

व्यवस्थापकीय संचालक, महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ (मर्या.), मुंबई,
आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,

**प्रत:-**

१. मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/ विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,
२. सर्व सन्माननीय विधानसभा/विधान परिषद सदस्य,
३. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अप्पर मुख्य सचिव,मंत्रालय, मुंबई,
४. मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई,
५. मा.मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. मा.राज्यमंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
८. सह सचिव (महामंडळे), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. सह सचिव (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ /२, मुंबई/नागपूर,
११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१२.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१३.सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई,
१४.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१५.कक्ष अधिकारी (का.अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई ३२,
१६.निवड नस्ती (का.महामंडळे).